अतिरिक्त आयुक्त, समाज कल्याण, पुणे या पदावर श्री.एम.एम.आत्राम, सहआयुक्त यांना पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः क्र. सकआ २०१४/ प्रक्र ५५/ आस्था-२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ३२
तारीख: २५ ऑगस्ट,२०१४

वाचा :

१) आयुक्त,समाजकल्याण यांचे पत्र क्र सकआ/आस्था-१/ अति.आयुक्त/पदोन्नती / प्रस्ताव /२०१३-१४/का-६/२४२, दिनांक १.२.२०१४
२) सामान्य प्रशासन विभागाचे गोपनिय पत्र क्र. ईएसबी-१११४/प्र.क्र.१६१/१३, दिनांक १९.०८.२०१४

**शासन आदेश :**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील समाजकल्याण संचालनालयाच्या आस्थापनेवर अतिरिक्त आयुक्तांचे एक पद मंजूर असुन ते सध्या रिक्त आहे. सदर पदावर पदोन्नती देण्यासाठी सह आयुक्त,समाजकल्याण या संवर्गातील अधिकाऱ्यांना पदोन्नती देण्यासाठीचा प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळासमोर सादर करण्यात आला होता.

२. त्यानुषंगाने आस्थापना मंडळाने दिनांक ८.८.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत केलेल्या शिफारशीनुसार श्री एम.एम.आत्राम, सह आयुक्त (शिक्षण) यांना अतिरिक्त आयुक्त, समाजकल्याण या पदावर रु. ३७४००-६७००० ग्रेड पे रु.८७०० या वेतनश्रेणीत खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

१) सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल मूळ याचिका क्र. ८४५२/२००४ च्या निर्णयाचे अधीन राहून करण्यात येत आहे.

३. श्री एम.एम.आत्राम, सह आयुक्त यांना अतिरिक्त आयुक्त या पदावर पदोन्नती दिल्यानंतर त्यांची पदस्थापना समाजकल्याण संचालनालय, पुणे येथील अतिरिक्त आयुक्त या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

४. आयुक्त, समाजकल्याण , पुणे यांनी श्री एम.एम.आत्राम यांच्या पदोन्नतीमुळे रिक्त होणाऱ्या सह आयुक्त (शिक्षण) या पदाचा अतिरिक्त कार्यभार श्री.एस.जी.पाटील, सहसंचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण पुणे यांच्याकडे सोपविण्यात येत आहे. श्री पाटील यांनी आपल्या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सांभाळून सह आयुक्त (शिक्षण) या पदाचा अतिरिक्त कार्यभार पहावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६१२४५१२७५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uttam Shivaram Lonare

Digitally signed by Uttam Shivaram Lonare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivaram Lonare
Date: 2014.08.26 12:43:28 +05'30'

**( उ. शि. लोणारे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) श्री एम.एम.आत्राम, सह आयुक्त (शिक्षण),समाजकल्याण आयुक्तालय, पुणे
२) श्री एस.जी.पाटील, सहसंचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण पुणे

प्रत

१) प्रधान सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण संचालनालय, पुणे
३) संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इमाव व विमाप्र कल्याण पुणे
४) उप सचिव (कार्यासन १३), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
५) मा.मंत्री/राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) सचिव (सा.न्या. व वि.स.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग (सर्व)
८) सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण (सर्व)
९) जिल्हा समाजकल्याण अधिकारी जिल्हा परिषद (सर्व)
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२) निवड नस्ती (आस्था-२)